सातारा जिल्ह्यातील खटाव तालुक्यातील योजनाबाह्य/अवर्गीकृत रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२५/प्र.क्र.६२/बांधकाम-५ (E-११६५४३६)

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई - ४००००१
तारीख: १६ जून, २०२५

**वाचा :-**

१) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२००८/प्र.क्र.०२/नियोजन-२, दि.२४ एप्रिल, २०१२
२) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्रमांक रवियो-२०२३/प्र.क्र.१३१/नियोजन-२, दि.२१ जुलै, २०२३
३) ग्राम विकास विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः जिपर-२०२३/प्र.क्र.०१/बांधकाम-५, दि.०४ डिसेंबर, २०२३
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्रमांकः का-२/रेशा/२९०९/सन २०२५, दिनांक १९ मे, २०२५

**प्रस्तावना :-**

राज्यातील योजनाबाह्य/अवर्गीकृत रस्त्यांना ग्रामीण मार्ग म्हणून व ग्रामीण मार्गांना इतर जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबतची कार्यपध्दती व निकष संदर्भाधीन क्र.३ येथील शासन परिपत्रकान्वये निश्चित करण्यात आले आहेत.

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधीन क्र. ४ येथील पत्रान्वये सातारा जिल्ह्यातील खटाव तालुक्यातील योजनाबाह्य रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना सन २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावामध्ये मागणीकृत रस्त्यांकरिता भुसंपादनाची आवश्यकता नसल्याचे व सदरहू रस्ते वन जमिनीतून जात असल्यास त्याबाबत वन विभागाची परवानगी घेतली असल्याचे कार्यकारी अभियंता (बांधकाम),

जिल्हा परिषद, सातारा, अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी प्रमाणित केले आहे. तसेच सदर रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजनेमध्ये समाविष्ट करणेबाबत जिल्हा परिषद, सातारा यांनी मागणी केलेली आहे.

त्यानुसार सदर रस्त्यांचा होणारा वापर तसेच प्रशासक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा यांचा प्रशासकीय ठराव विचारात घेता, सदरहू रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व प्रशासक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा यांचा प्रशासकीय ठराव विचारात घेऊन सातारा जिल्ह्यातील खटाव तालुक्यातील खालील रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना सन २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | साखळी क्रमांक | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|
| | | तालुका-खटाव | | |
| १ | अनफळे ते पडळ रस्ता | ०/०० ते ४/५० | ४.५० | ग्रामीण मार्ग-१६८ |
| २ | औंध (गणेशवाडी) ते करांडेवाडी रस्ता | ०/०० ते ३/०० | ३.०० | ग्रामीण मार्ग-१८६ |
| ३ | फडतरवाडी नेर ते वेटणे ओढा रस्ता | ०/०० ते १/५० | १.५० | ग्रामीण मार्ग-२४३ |
| ४ | गोरेगाव वांगी शिंदे वस्ती ते नांदणी नदी रस्ता | ०/०० ते १/०० | १.०० | ग्रामीण मार्ग-१७१ |
| ५ | कानकात्रे ते वडाचा मळा ते रामा-१४३ रस्ता | ०/०० ते १/५० | १.५० | ग्रामीण मार्ग-१६२ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ६ | सातारा पंढरपुर रोड ते कुंभारटेक लेंडुरी ओढ्यापर्यंत ते गोरेवस्ती पुसेगाव रस्ता | ०/०० ते १/२० | १.२० | ग्रामीण मार्ग-२३५ |
| ७ | मानेवाडी ते यलमरवाडी (एनकुळ) रस्ता | ०/०० ते २/५० | २.५० | ग्रामीण मार्ग-२६७ |
| | | **एकुण लांबी** | **१५.२०** | |

२. परिणामी रस्ते विकास योजना सन २००१-२१ मधील सातारा जिल्ह्यातील ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत खालीलप्रमाणे बदल होत आहे.

| अ.क्र. | रस्त्याचा दर्जा | दर्जोन्नती पुर्वीची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नत केलेली लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरची एकूण लांबी (कि.मी.) |
|---|---|---|---|---|
| १ | ग्रामीण मार्ग | ६७३१.२७ | (+) १५.२० | ६७४६.४७ |

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१६१२०५०२७८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2025.06.16 14:54:41 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव

३. विभागीय आयुक्त, प्रादेशिक विभाग, पुणे
४. जिल्हाधिकारी, सातारा
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना सन २००१-२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
८. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना सन २००१-२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

**प्रत,**

१. उप सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय
२. अवर सचिव (नियोजन), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय
३. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सातारा
४. कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, सातारा
५. रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय
६. निवडनस्ती (बांध-५)